# पहांटवारा

[ निवडक कवितांचा सङ्ग्रह ]



वि. म. कुलकर्णी

किंमत दोन रुपये

प्रकाशक :
प्रा. वि. म. कुलकर्णी,
" सरस्वती "
गोंधळी गल्ली, बेळगांव.

मुद्रक :
श्री. पी. के. जाधव,
श्रीछत्रपति प्रिंटिंग प्रेस,
बेळगांव.

मुखपृष्ठ : चित्रकार श्री. मुळगांवकर, मुंबई.



प्रथमावृत्ति : मे १९४९.

मिळण्याचीं ठिकाणें :—

(१) बुकसेलर्स को-ऑपरेटिव्ह ट्रेडिंग असोसिएशन लि.
२१७, चर्नीरोड, मुंबई ४.

(२) व्हीनस बुकस्टॉल, अप्पा बळवंत चौक, पुणें २.

(३) ' श्रीकान्त ग्रंथमाला ', ६ शुक्रवार, पुणें २.

# समर्पण



माझा मुलगा

**चि. श्रीकान्त**

व

माझी पुतणी

**कु. सुगन्धा**

या, क्षितिजावर आलेल्या,

नव्या पिढीच्या प्रतिनिधींना—

" आतां अभिनववाग्विलासिनी
जे चातुर्यकलाकामिनी
ते शारदा विश्वमोहिनी—
नमिली मियां."

# प्रस्तावना

प्रा. वि. म. कुलकर्णी हे साहित्याच्या प्रांगणांत नवीनच उतरत आहेत, असें नाहीं. जानपदकथा, कादंबरी, पटकथा हे ललितवाङ्मयाचे गद्य प्रकार त्यांनीं हाताळले आहेत, तसेंच त्यांचें एक खंडकाव्य व एक बालगीतांचा संग्रहहि प्रकाशित झाला आहे. टीकावाङ्मयाकडे ते अलीकडे वळले आहेत. व त्यांच्या व्यवसायामुळें या वाङ्मयप्रकारांत ते लवकरच प्रभुत्वहि मिळवतील, याविषयीं मला खात्री आहे. त्यांच्या कविता ‘ अभिरुची ’ सारख्या आजच्या प्रथमश्रेणीच्या मासिकांत रसिकांना वरचेवर पहावयास मिळतात. अशा सुविदित कवीच्या काव्यसंग्रहाला प्रस्तावनेची कांहींच आवश्यकता नाहीं. परंतु ती असावी असें त्यांना वाटलें तर ती पुरवणें हें माझें एक स्नेहमूलक कर्तव्यच मीं समजतों. एवढेंच नव्हे; त्यांच्या कांहीं चांगल्या कविता वाचून मनाला आनंद झाला. त्या कवितांच्या परिमलानें कांहीं क्षण मन प्रसन्न झालें. त्या लाभाची फेड

अंशतः तरी करणें अवश्य आहे. आणि सत्कवितेचा आनंद व्यक्त करणें, इतरांना तो चाखण्याची विनंती करणें, हाच कवीचे उतराई होण्याचा मार्ग नाहीं काय ?

कवितेच्या कोणत्याहि युगांतील तरुण कवींमध्यें तत्कालीन प्रस्थापित परंपरेविषयीं दोनतीन प्रकारच्या वृत्ती दिसतात. कांहीं प्रस्थापित परंपरेला धरून काव्यनिर्मिती करितात. नामवंत व ज्येष्ठ अशा कवींचे ते पडसाद बनतात; व त्यांची परंपरा पुढे चालवितात. कांहीं त्या परंपरेपासून फुटून निघतात. स्वतःचा असा दृष्टिकोण, स्वतंत्र काव्यवृत्ति त्यांना लाभलेली असते व तिच्या बळावर नवीन काव्यप्रकाराचा, नव्या शैलीचा व नव्या तंत्राचा, ते शोध करीत असतात. कधींकधीं या नव्या उन्मेषांचा शोध करणाऱ्या मनांना आपल्या भोंवतालीं असेच प्रयत्न चाललेले आढळून येतात; ते थोडेबहुत यशस्वी झालेले दिसून येतात. व मग त्यांच्या स्वतःच्या प्रयत्नांना व अभिव्यक्तीला त्यांसारखेंच वळण मिळतें, जोर येतो. कित्येकांकडून या नव्या प्रयोगात्मक वाटेचा निःसंदिग्ध स्वीकार होत नाहीं. त्यांना कधीं त्या पायवाटेचें प्रलोभन वाटते तर कधीं जुना डौलदार राजमार्ग हवासा वाटतो. आजच्या मराठी कवितेंत असेंच कांहींसें झालें आहे. नवीन कवींपैकीं कांहींची कविता अजून तांबे किंवा ' रविकिरण ' कवी यांच्या नादमधुर व संगीतनिष्ठ वळणावर जाते. व त्या त्या संकेतांनीं नटलेली असते. कांहीं कवींनीं तो मार्ग सोडून उत्कट विचारप्रधान, प्रायः मुक्तछंदगत किंवा सरळ व स्पष्ट अभिव्यक्तीसाठीं योग्य अशा अक्षरछंदगत काव्याच्या निर्मितीचा

' पहांटवारा ' या संग्रहांतील अभिनवतेच्या झुळुकीनें रसिकांना आनंद होईल, तशीच त्यांतील निरीक्षणशक्ति व सहानुभूतीची व्यापकता त्यांना स्वागतार्ह वाटेल. परंतु त्यांतील कांहीं कवितांमध्यें दिसून येणारी अंतर्मुख जाणिवेच्या अचूक अभिव्यक्तीची शक्ति जाणत्या रसिकांना अधिक मोलाची वाटेल, अशी माझी कल्पना आहे. काव्याचा छन्द ( पान ७४ ) हा ' निराळा ' च आहे.

छन्द हा ज्याला कळाला
जीवनीं रस त्याला मिळाला

या श्री. कुलकर्णी यांच्या पंक्तींत एकाद्या शब्दाची ओढाताण असली तरी त्यांतील अनुभव खरा आहे. व अशा रसाचा मूलस्रोत ज्यांत आहे त्या अंतर्मुख जाणिवेच्या सच्चेपणाची जपणूक ते करतील, याविषयीं मला शंका नाहीं.

८८ पश्चिम उद्यान मार्ग
धनतोली, नागपूर.
२२।४।१९४९.

आत्माराम रावजी देशपांडे.



# माझें मनोगत....

माझ्या स्फुट कवितांचा हा पहिला संग्रह पुणें येथें प्रा. श्री. बा. रानडे यांच्या अध्यक्षतेखालीं भरणाऱ्या कवि-संमेलनसमयीं प्रसिद्ध होण्याचा योग लाभत आहे याबद्दल मला आनंद वाटतो.

१९४० ते १९४९ या पाऊण तपाच्या कालावधींत मीं लिहिलेल्या कवितांपैकीं कांहीं येथें संग्रहित केल्या आहेत.

—जीवनाची वाटचाल करितांना 'कविता' माझी मनापासून सोबत करीत आहे...अनंतरूपांनीं अनंतठायीं नटत राहणाऱ्या जीवनतत्त्वाचें दर्शन या कवितासखीनें अनेकदां मला घडविलें......हिच्या संगतीं सहृदय रसिकांनाही माझ्यासारखा अनुभव यावा हीच नम्र इच्छा मनाशीं बाळगून हा संग्रह हातावेगळा करीत आहें......

कविवर्य अनिल ( आत्माराम रावजी देशपांडे ) यांनीं माझ्या विनंतीला मान देऊन कार्यव्यापृततेंतूनहि सवड काढून प्रस्तावना लिहून दिली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. अनेक स्नेहीसुहृदांच्याही प्रेमळ उत्तेजनाची उजळणी कृतज्ञ भावानें आज मनांत होत आहे.

अनेक श्रेष्ठ मराठी मासिकांतून या कविता प्रथम प्रसिद्ध झाल्या. सर्व संपादक-मित्रांचा मी आभारी आहें.

मुंबईचे सुप्रसिद्ध चित्रकार श्री. मुळगांवकर यांनीं मुखपृष्ठावरील चित्र काढून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानितों. बेळगांव येथील श्री छत्रपति प्रिंटिंग प्रेसचे मालक श्री. जाधव यांनीं सुंदर मुद्रण करून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडे आहेत.

माझे प्रिय बंधु बाबूराव कुलकर्णी व माझी पत्नी सौ. कमल यांच्या सहकार्याबद्दल मनापासून आभार व्यक्त करावेसें वाटतात, पण तें त्यांना रुचणार नाहीं !

**'मे दिन' : बेळगांव;**
१-५-१९४९.

**वि. म. कुलकर्णी**

# ....अनुक्रम....

# पहांटवारा

[ जाति : परिलीना ]

झुळझुळता झुळझुळता ये पहांटवारा
मंद मधुर गंध-रुचिर जीव सुखविणारा
चंद्रासह पश्चिमेस मावळली रात
पदन्यास पूर्वेला करित प्रिय प्रभात
पाठ गायनाचे घे कोकिळा बनांत
कलिका नव वसनांच्या लेती शिणगारा

ग्रीष्माच्या तप्त दग्ध भूमिवर वरून—
वळिवाची पहिली सर येइ सरसरून,
माती ती शांत होत फुलत मग फिरून
गंध धुंद तो—तसाच हा पहांटवारा !

शुक्रदीप—नीरांजन घेइ उषा ताटीं
देखुनि रथ सूर्याचा, उधळि कुंकुमा ती !
अष्ट दिशा हा अपूर्व सोहळा पहाती
प्रभु—पूजन—समयींचा जणुं विंझणवारा !

श्रान्त जीवनाचाही हारपला शीण
जग जागें होय अतां देखणें, प्रसन्न
कुजबुजतो पाणवठा, किलबिलतें रान !
घाटावरि नरनारी करिति येरझारा

—रात्रींच्या यज्ञाची होउनी समाप्ति
पूर्व—वेदिवरि येइल नारायणमूर्ति
तेजाचा रत्नकलश घेउनिया हातीं
झळझळतिल पृथ्वीवर नव अमृतधारा !!

---

## मनीषा—

[ जाति : नववधू ]

नरजन्म मिळो हा पुनःपुन्हा !

प्रभात, सायंकाल सुशोभित
निर्मल सरिता, फुलें सुगन्धित
निसर्ग यांसह हांसत नाचत....
गमतसे स्वर्गही येथ उणा !
नरजन्म मिळो हा पुनःपुन्हा !

शिरिं मातेची माया—पांखर
श्रवणीं मंजुळ कान्तेचा स्वर
बालहास्य निर्व्याज मनोहर
विश्वांत उधळि आनंद—धना
नरजन्म मिळो हा पुनःपुन्हा !

निजध्येयास्तव झुंज झुंजुनी
फुलांपरी आघात झेलुनी
रुधिरें ही तनु निघतां न्हाउनि
जिंकण्या पणानें 'रणांगणा,'
नरजन्म मिळो हा पुनःपुन्हा !

अन् धगधगतां स्थंडिल मोतीं—
घेत अनाथांच्याच आहुती,
थांबुनिया तें, व्हाया शांति
अल्पशा अर्पिण्या बलिदाना,
नरजन्म मिळो हा पुनःपुन्हा !

मानव म्हणुनी जगावयाची
'मानवपण' उपभोगायाची
हौसचि मम चिरतरुण मनाची
मोक्षाच्या यांतचि पटति खुणा !
नरजन्म मिळो हा पुनःपुन्हा !!

---

# नवें पाणी !

[ जाति : माधवकरणी ]

आलें नवें नवें पाणी !
उसळत, घुसळत, फेसाळत जळ धांवे दाहि दिशांनीं !

ग्रीष्म संपतां, मृगापरी ‘ मृग ’ धांवत हा आला
घेउनी मेघांच्या माला—
कलाबतूची वीज चमकते ज्यांवर थरथरुनी.
आलें नवें नवें पाणी !

उदासवाणी पाहुनि अवनी वरुणा ये कणव
कृपेचा करि तो वर्षाव
कोसळलें जळ वरुनि पृथ्विवर धाराधारांनीं
आलें नवें नवें पाणी !

तप्त गिरीवर, तप्त दरीवर शिडकावा होतां
तोषली वसुन्धरा माता
समाधान—उद्गार बोलती सुगन्ध मातींतुनी !
आलें नवें नवें पाणी !

नदिनाल्यांना पूर लोटला तुडुंब चाले जळ
नयाची अवखळ हो खळ्खळ
दुथडी भरल्या गोकुळांतल्या ‘ त्या ’ यमुनेवाणी !
आलें नवें नवें पाणी !

हें नवजीवन हें संजीवन ये इहलोकांत
नवतिची नवी ऋचा गात
मृत्युलोकची कळा पालटे, पृथिवी हो तरुणी !
आलें नवें नवें पाणी !

किल्मिष, कंटक, चिखल मातला पात्राच्या पोटीं
तयाला जळ हें देइ गती !
समतेची जणुं लाल ध्वजा ही राही फडफडुनी !
आलें नवें नवें पाणी !

पायदळींचीं दडलीं बीजें येतिल तरतरुनी
धुमारे तणारेहि फुटुनी
'सस्यश्यामला सुजला सफला' होइल हो धरणी !
आलें नवें नवें पाणी !

उसळत, घुसळत, फेसाळत जळ धांवे दाहि दिशांनीं
आलें नवें नवें पाणी !

---

# गुलाबाची कळी....

[ मुक्तछंद ]

—आज मी पाहिली
गुलाबाची कळी
टपोरी, फुगीर
गुलाबाची कळी !
रसरसलेली
मुसमुसणारी
सौंदर्यबनाची
रूपपुतळी ! १

—दंवबिंदूंचें
स्नान केल्यानें
ताजीतवानी
झालेली कान्ती ! २

—ओटीपोटाशीं
बिलगणारें
अरधेंमुरधें
हिरवें वस्त्र !
एका पाकळीचा
पदर नाजूक
होता वाऱ्यावर ! ३

—शृंगाराविणही
मोहवी मजला
कळींच्या मुखींचा
टवटवीत तो
कोमलपणा. ४

—आपुल्या नादांत
आपुल्या मदांत
मुग्धपणेंच ही
लुब्ध करी मन ५

—उमलेल परी
उद्यां अंतरंग
खुलतील कळा
फुलतील रंग
नवतीचे रंग !
धुंद धुंद रंग !! ६

---

# बहुरूपी मानवता

[ जाति : अञ्जनी ]

अनंतांतुनी पुढती आली—
शतक शतक तुडवीत पाउलीं
निघे सच्चिदानंद–देउळीं
‘ यात्रा ’ जी चालली कधींची—ती ही मानवता ! १

कोण आपुला समर्थ जनिता ?
कोणा तेजाची ही सत्ता ?
सान्तामधिं धुंडीत अनन्ता
आत्मचिंतनीं करि ‘ हरि-’ चिंतन—ती ही मानवता ! २

अफाट दुनियेच्या पाठीवर
भावभावनांच्या वीणेवर
‘नवरस’ गातां, पुढें करुनि कर
भीक सुखाची मागत फिरते—ती ही मानवता ! ३

परमेशाची कृती धरित्री
व्हाया सुखसंस्कृतिची धात्री
तनुच्या अभिषेकाच्या पात्रीं
त्यागाचें जल भरुनि करि रितें—ती ही मानवता ! ४

आणिक हातीं एकच काठी
घेउनि, पीडित जनतेसाठीं
दुःखाचा गोवर्धन उचलिति
मोक्ष म्हणति हा, जिचे महात्मे—ती ही मानवता ! ५

---

# एक महात्मा निघून गेला !

[ जाति : पादाकुलक ]

मानवतेला भूषविणारा
एक महात्मा निघून गेला !
मानवतेला तोषविणारा
तो धर्मात्मा निघून गेला !

रक्ताचा तो अंतिम थेंब
यज्ञ—सांगता करून गेला.
विश्व—उजळत्या त्या सवित्याचा—
एक किरण नित उणा जहाला !

दिवस उगवती आणि संपती,
जगकर्त्याचीं चक्रें फिरतीं,
भीषण जाणिव मधेंच टोचें—
‘ अतां तयाचा दिवस न उरला ’

जाळिन पशुता मानवांतली,
जीवन त्यानें ‘ सुवर्ण ’ केलें;
जीवनांतलें मरण जिंकुनी,
मरणालाही अमर बनविलें !

सेवापुण्यें याचीं सेवुनि,
माता अमुची होय शुभंकर;
रक्षा याची भालीं चर्चुनि,
पावन झाले सरितासागर !

लोकदास हा,—लोकवंद्य हा,
सत्याची करि एक अर्चना;
शुद्ध अहिंसा म्हणे साधना,
एकपणाचा एकच बाणा.

“ चंद्रमाच तो अहा ! अलांछन,
मार्तंडच तो तापहीन हो !
तो सर्वांही सदा सुसज्जन,
बंधु सोयरा होउनि गेला ! ”

दिव्यत्वाची पाउलवाट
खिन्न जगामधिं चमकुनि गेली,
यंत्रयुगाच्या मरुस्थलांतुन
गङ्गा वाहत वाहत गेली !!

साधुत्वाचें हें सौंदर्य
स्मरणीं आतां जगवायाचें;
पुण्यात्म्याच्या परंज्योतिवर
दीप घरोघर उजळायाचे !!

———

# माझा उजळ उम्बरा....

शुभमंगल वेळेला — सखि! आज येसी घरा!
तुझ्या सोन्याच्या पाउलीं माझा उजळ उम्बरा!

गाई परतल्या घरां प्रेम घेऊन वासरां
झाला गोरज–समय प्रेममुहूर्त हो खरा!

तुझ्या प्रीतनिरांजनें लक्ष दीप उजळती
तुझ्या नेत्रकटाक्षानें लक्ष भाव उसळती....

अंत:पट होतां दूर अंत:करणें मिळतीं!
नेमियेल्या स्नेहज्योती एकरूप, एक होती!!

सप्तपदें चालतांना सप्तजन्मांची सांगता
एका मंगलसूत्रानें बद्ध झालें उभयतां!

देवाब्राह्मणांसमक्ष दिली पदराला गांठ
हात घालून हातांत आतां चालायाची वाट!

माहेरच्या परसांत खेळलीस ग, उदण्ड
सासरच्या अंगणांत चल नवा डाव माण्ड!!

गहूं–भरलें हें माप तुझ्या लाथें कर रितें
प्रेम भरलें अमाप हेंच मला तें दावितें

गृहलक्ष्मीचा प्रवेश आतां मज काय उणें?
सौंदर्याचीं, संपदेचीं— घरां आलीं त्रिभुवनें....

सुवर्णाक्षता टाकून सूर्यराज गेले घरीं
परी चंद्र पौर्णिमेचा उदयला माझ्या दारीं!

आतां चांदणें जनांत आतां चांदणें मनांत
आतां माझ्या घरींदारीं चांदण्याची बरसात!!

# साक्षात्कार !

[ छन्द : देवी-वर ]

तुझी माझी भेट झाली प्राजक्ताच्या झाडाखालीं
मधुफुलांत–बोलांत दोन देहमनें न्हालीं !

रक्तलाल देठांतून श्वेतपाकळ्या फुलल्या
तुझ्या रम्य गात्रांतून प्रीति-शलाका खुलल्या !!

तुझी माझी भेट झाली होती अष्टमीची रात....
' कृष्ण भेटला राधेला ' कुठें मनाच्या वनांत !

नील नेत्रांच्या राउळीं माझें ब्रह्म गंवसलें
आणि, क्षणीं दूर झालीं दुःखदैन्याचीं पटलें

ताप त्रिविध लोपले हारपल्या आधिव्याधि
तुझ्या प्रेमें, ' जागेपणीं ' –माझी लागली समाधि !

स्थल–काल–दिशा यांचे बन्ध जाहले विलुप्त
दोन देहीं एक मन असें साधलें अद्वैत !

आजवरींच्या प्रवासा आतां दिला मी विराम
खूण अंतरीं पटली हेंच माझें चिरंधाम !

विष अमृतचि झालें ! –चंद्रिकेला फुलें आलीं!
रूप जडलें सुगंधा ! सृष्टि स्वर्गरूप झाली !

प्राजक्ताच्या झाडाखालीं असा झाला चमत्कार—
माझें तप फळां आलें झाला मला साक्षात्कार !!

---

# श्रमदेवता

[ जाति : पादाकुलक ]

आठवड्याचा हा बाजार    हौस, मौज अन् उद्योगाचा
उन्हांमधेंही धडपडणाऱ्या    जीवनलोलुप मानवतेचा....

कुणी द्यावया, कुणी घ्यावया    जमली येथें बहुत मंडळी
तेली तांबोळी; अन् साळी    उभा घेउनी लुगडीं-चोळी

कुठें मिरचिचा उठे खकाणा    ठसका दावित गिऱ्हाइकांना
कांद्याचा अन् पाचोळा तर    पुष्पवृष्टि करि भिरभिरतांना !!

—खेड्यांहुनि या धापा टाकित    पहा पातल्या कारभारिणी
माथां घेउनि 'हिरवी सृष्टी'    किंवा नाजुक साजुक लोणी

रणरणते वर ऊन, तयाची    खंत कोठली या मातांना ?
वितळायाच्या नव्हेत त्या,—कीं    पांढरपेशा पांडुर ललना !

कृष्णेच्या कांठची तुम्हांला    हवीत वांगीं ना चवदार ?
ऊंस, कांकडी, मळिचीं कणसें    या, या घ्या तर ताजीं सुंदर !

'काळी मैना' डोंगरदरिंची    घ्या करवंदें आंबटगोड
लाल खाप घ्या कलिंगडाची    घ्या आंब्याची साखरफोड !

घामानें पिकवोनि दौलती    लुटावयाच्या त्या परक्याला !
परंतु, क्रम हा आयुष्याचा    ठरून गेला, ठरून गेला

—या मातांची चाले धांदल चारच तासांचा हा खेळ
सौदा पटवा, जिन्नस उठवा सरून जाइल ना तर वेळ!

आणि हवा कीं घरास न्याया मीठ—मसाला संसाराचा
बाळासहि घ्यायचे चुरमुरे! गांव दूरचा गांठायाचा!

—जिन्नस खपतां, गृहलक्ष्मीची सतेज मुद्रा प्रसन्न होई
दंडाच्या चोळींत रुपाया रुतून बसला, बसला बाई!

परंतु, निढळावरिंचा 'रुपया' भिजून जाई हो घामानें
श्रमसौंदर्याचें तें कुंकू चमचम चमके सांध्य उन्हानें!!

———

# सोनेरी नागास—

[ मुक्तछंद ]

अरे धनवंता !
संपली तुझी मिरासदारी
संपली तुझी पुंजी शिदोरी !
आमुच्या हक्काच्या दौलतीवरती
वेटोळें घालून बसलेल्या नागा, सोनेरी नागा !
पुरे कर तुझे फूत्कार सारे
बाहेरचा वाडा पडला आहे....पाडला आहे
भिंतींना नाङगर लागला आहे !

किडलेला वाडा ढांसळत आहे....
तुळई–पटई कोसळत आहे....
... ... ... ... ... ... ...
पांढरपेशांच्या पोशाखासारिखे—
भिंतींचे ते रंग
मातीला आहेत आतां मिळत !
उंच भिंतईच्या पुष्ट श्रीमंताच्या गालासारिखा तो
गुलाबी रंग
दिवाणखान्याचा,
' देव-'घराचाही—
मातीलाच आहे आतां मिळत !!....

तळघरांतील पुंजीच्या मालका
ऐक तो हातोडा ठकाकत आहे—

तुझ्या मांडीखालीं
शतकें शतकें उबविलेली सुवर्णसंपत्ति
फोडून तो हंडा नेईल बाहेर....ऐक तो हातोडा!
—सुवर्णाचीं नाणीं जातील बाहेर
जातील प्रकाशीं;
—ऐक तो हातोडा
—देख तो नांगर....

सारें कोसळतां—
सारें उधळतां—
तुझ्या दातांतला थेंब तो एकला
काय तारील? काय करील?
अरे धनवंता, अरे धनवंता,
बाहेरचा वाडा पडला आहे
भिंतींना नाङ्गर लागला आहे!!

———

# सतार झाली मुकी !

ही आजवरींची मधुर मधुर बोलकी
तव सतार, मित्रा ! अतां जहाली मुकी !!

तारांचा जमवुनि सुंदर मोहक मेळ
तूं मांडिलास जों मधुर स्वरांचा खेळ
तों, येउं नये ती अवचित आली वेळ

अन् नाजुक तन्तू तुटोनि गेलाच कीं !
तव सतार, मित्रा ! अतां जहाली मुकी !

आळविली नव्हती पुरती तूं अस्ताई
तों गान खुंटलें–असली कसली घाई ?
ही अपूर्णता कां ? कसली ? कोणापायीं ?

भैरवी कशी ये प्रारंभीं नेमकी !....
तव सतार, मित्रा ! अतां जहाली मुकी !

तिमिरांतुनि यावी तीक्ष्ण अनामिक दीप्ति !
अन् वृथा फुटावी सान खगाची छाती
तें चिमणें गाणें अरधें वाऱ्यावरतीं

अन् अरधें जावें लोपुनि कालोदकीं !
तशि सतार, मित्रा ! तुझी जहाली मुकी !

—यापुढतीं ऐकिन लाख सतारी कानीं
परि सतारिचा तव नाद न येइल श्रवणीं
गवसणींत पडली ती तर केविलवाणी

ती स्मरणीं येतां घण बसती मस्तकीं....
हा ! सतार, मित्रा ! तुझी जहाली मुकी !

# पलित्याची ज्योती !

[ चाल : दृष्ट हिला लागली ]

जळती अन् जागती....उभी मी, पलित्याची ज्योती !

उभी काळतळावरी कधींची
संघर्षासहि सिद्ध सदाची
जलरेखेपरि जिवट जिवाची—
सर्वकाळ तेवती; उभी मी, पलित्याची ज्योती !

अग्निकङ्कणाचें या बंधन
जन्मापासुन झालें भूषण !
सर्वस्वाचें अर्पुनि इन्धन—
रक्षियली जागृती; उभी मी, पलित्याची ज्योती !

पिसाट वारे परमुलुखाचे
घोङ्गावत मज वेढायाचे
राक्षस, वाटे दुष्ट मनाचे
नाचति 'बळि-'भोंवतीं; उभी मी, पलित्याची ज्योती !

घरच्या काळोखाचा पाश
क्रूरपणें कधि रोधी श्वास
चळला, ढळला नच विश्वास
झालि न ध्येयच्युती; उभी मी, पलित्याची ज्योती !

जळत जळत हा देह चालला
परी तयाची खन्त कुणाला,
उजळत जोंवर दाहि दिशांला—
तेजकिरण फांकती; उभी मी, पलित्याची ज्योती !

---

# उंच हवेली,

## हिरवी माडी !

उंच हवेली हिरवी माडी
आंत नाचते गुलाबसाडी,
'कालि चार'चा सूर लागला
उंच तयापरि घुमतो तबला !

पैंजण रुमझुम छुमछुम करिती
भाव रेशमी घाव घालिती !!
नोटा घेण्या हात नाचवी
नेत्रांची ती किमया दावी....

विलासवर अन् लक्ष्मीधरही—
दीन भिकाऱ्यापरी बैसले
नाण्यांचा खणखणाट आणिक
हास्याचा खळखळाट चाले !

—आणिक खालीं रस्त्यावरती
जिन्याजवळि कुणि बसली होती
अंध पतीची सालस पत्नी
कुशीस घेउनि ‘ सोन्या रत्नी ’

शुष्क स्तनाग्रें चोखचोखुनी
बाळ पीडितें, घेइ सोसुनी....
दीन फाटका पदर दाखवी
भीक मागण्या हात नाचवी

माडी उतरुनि येणारांची
लाथ लागते तिजला साची
परि ‘पोटांच्या’ खळगीसाठीं
रडवें हांसूं सुकल्या ओठीं !

रडवें हांसूं मागे दमडी....
आंत नाचते गुलाबसाडी !!

———

# खेड्यांतील एक सायंकाळ

धूसर सोनेरी किरणांच्या
मंद मंद जाहल्या शलाका
'रवि मावळला' 'रवि मावळला'
पक्षि बोलले एकामेकां

सळसळणारीं पिंपळपानें
दमतां खेळुनि, पेंगुं लागती
कुठें कावळे कडुनिंबावर
काव काव किति कर्कश करिती

हिरव्या माळावरी चरोनी
गुरें निघालीं घरास परतुन
शीळ वाजवी मुरलीमधुनी
कुणी गुराखी त्यांच्यामागुन !

—हळूहळू या चुली पेटती
धूर निघे तो डौलानें वर
शिणून भागुन येइल मालक
हवी तयाला ताजी भाकर

चुलीपलिकडे जळते दिवटी
प्रकाश फेंकित उदासवाणा
तिथेंच साध्वी दीनपणानें
करिती अन्न-ब्रह्म-प्रार्थना !!

कुणि तुकयाचा अभङ्ग गाती
एकतारिचा पिळून सूर !
अंधारांतच शांतपणांतच
कुणि चिलमीचा काढिति धूर !!

—परी एकदां चमत्कार हो
भाग्यवंत 'बेचाळिस सालीं',
कोठुनि धांवत दौडत आली
'प्रतिसरकाराची' नव टोळी

भूमीगत परि लखलखणाऱ्या
वरी वरी उसळल्या शलाका
अन् त्या रात्रीं सूर्य उगवला
नवल वाटलें निद्रित लोकां !

त्या सूर्यानें त्या लोकांची
झोप उडविली; रात्र उजळली !
नवी घोषणा, नवी चेतना
"चले जाव" ललकारत उठली !

—क्रांतीच्या अन् स्वातंत्र्याच्या
लाख लाख पाहून शलाका
'रवी उगवला', 'रवी उगवला'
पक्षि बोलले एकामेकां !!

———

# अखंड धरणावरील पिंपळ !

[ मुक्तछंद ]

माझिया गांवाला खळखळणारी वाहे एक नदी....
बांधोनी तिजला उत्तुंग धरण
पिकांना आणावें तियेचें जीवन
करावी धनाची, धान्याची समृद्धि
स्वातंत्र्य, शांतता
लाभावी सकलां
याचसाठीं कोणा महात्मा जनांचे चालले प्रयत्न

गाळूनिया घाम
शिंपूनिया रक्त
चालविला त्यांनीं धरणाची भिंत बांधाया अटाट !
परंतु दुर्दैवें एकदिनीं तेथें येऊनि पडलें
पिंपळवृक्षाचें अणुसम बीज !!
भिंतीचें तें काम चाललें अखंड
पिंपळबीजाचें अवधान कोणा ?

अन् एक दिनीं....
तो इवला अंकुर वर उगवला !
गाळूनिया घाम शिंपूनिया रक्त
भिंतीचें तें काम पूर्णते चाललें

—परी तो पिंपळ लागला वाढीस
सुशान्त चंद्राला ग्रासणारा राहू !
म्हणाले कोणी, 'रे ! उपटा हें रोप; उपटा नि फेंका !'
परंतु शहाणे अन्य ते म्हणाले—
' अहो हा अश्वत्थ !....धर्माचा हा वृक्ष शापील आम्हांतें
अन् होईल ती हिंसा !....राहूं द्या, राहूं द्या !'
दिनानुदिन तो वृक्ष थोर झाला
पिंपळाचा वृक्ष !

अन्
धरणाचें पाणी धरित्रीकारणीं पोंचायाच्या आंत
अणुसम बीजानें अणुस्फोट केला !!
—पिंपळमुळांनीं
पोखरिली भिंत
उखडिले चिरे
विध्वंस—
विध्वंस—
विध्वंस जाहला !!

---

# दिसशी आज निराळी !

दिसशी आज निराळी
सखि तूं, दिसशी आज निराळी !

मंगलदिनिं, त्या मंगलकालीं
रूपमती तूं रम्य, देखिली
आज झळाळी, दिसे आगळी, जादु काय घडली ?

हरिणीची चपळाइ लोपली
गति हंसीची कधीं घेतली
सोनसळीची अवचित कां गऽ चांफेकळि बनली ?

फूल उमललें वेलीवरचें
दूर राहिलें खुडावयाचें
कुरवाळिशि त्यां; निसर्गप्रीती कुठुनि प्रिया शिकली ?

—पाहत बससी पहांट-तारा,
अस्फुट कलिका उमलविणारा
तेजोगर्भा उषा पाहुनी, गुणगुणसी ओळी !

दारिं प्रभातीं वदे 'पिंगळा'
'चंद्रोदय या असे घराला'
वच हे श्रवनां क्षणांत फुलली काया कां सगळी ?

---

# अणु–स्फोटक !

[ मुक्तछंद ]

एक लक्ष जन
एकच क्षण
एकच अणु-स्फोटक पण—!
बळी सारेजण;
अपराधी आणि निरपराधीही,
गर्भवती कोणी,
रुग्ण पंगु कोणी,
डोळ्यांचे काजवे लुकलुकविती बालकें कोणी
पांखिफुटे अशीं सान पांखरें !
साऱ्यांची चिता एकाच क्षणीं
एका सरणीं !...............

नंदनवनाचें झालें स्मशान
गोपुरें, मनोरे,
ग्रंथांचीं मंदिरें,
अग्निदेवाय जाहली स्वाहा—
एका क्षणांत................
जीवनाच्या सर्व इष्टदेवता
दीर्घ आक्रंदत आचके देत
........गेल्या जळून.

मुठीएवढा एक स्फोटक
विधात्याचें एक मधुर स्वप्न
भंगून टाकी !
प्रलयंकर महारुद्राचा तृतीयनेत्र
गंवसला का आज नराला ?
सात मैल उंच
ळळळळत्या पहा या ज्वाळा !
" परमेशा ! तुझे सारे गडकिल्ले आम्ही जिंकिले रे ! "
सांगायासाठीं का
विजयादेश हा
मानववीरांनीं ' चूड ' पेटविला येथें पृथ्वीवरी ?

अणु-स्फोटका रे ! धन्य धन्य तुझी ( ! )
केवढें सामर्थ्य !
केवढी महती !
आजपासून आम्ही सारेजण
गाऊं स्फोटका तुझी आरती !!
तुझा अवतार जाहल्याक्षणीं—
महायुद्धाची अन्
शांततेचीही दांतखीळ बसे
नाकळे, तीं आतां होणार ' शांत ', किंवा जिवंत ?
सुख, संपत्ति,—संतोष सारे
रावणाच्या घरीं देव होते तसे
तुझेंच अंगण झाडतील रे !!

—मग बापड्या मानवांनीं आम्ही
तुजवीण कोणा सांग आळवावें ?
नित्य पूजावें ? नित्य प्रार्थावें ?
' हिरोशिमांतले ' कित्येक देव—
जाळिलेस ना तूं देव्हाऱ्यांसह ?
धन्य तुझी शक्ति !

—आतां येथून पुढती पुढती
तूंच आमुचा देवाधिदेव !
तूंच आमुचा महाशाळिग्राम !!
तुझीच आम्ही गाऊं आरती !

---

# वेडी आस

[ छन्द : ओवी ]

घर आपुलं ग होतं – गांवकुसवालागून
ओढा वाहे बिलगून

चंद्रमौळी कौलारांत – झिजे मायेचा चंदन
ऊन जाहालं चांदण !

गाईवासरं गोठ्यांत – त्यांची हंबरे दावण
अंगणांत वृंदावन

ओसरीला चिमण्यांची – चाले गोड किलबील
घुमे पारव्याची शील !

सोप्यावर बसून तूं – आई ! दळप दळावं
तेंच सांजेला मळावं....

तुझ्या जात्यावरीलऽ – सूर ओवीचा ग मला
लावितसे छंद, ळळा

तुझ्या मांडीवर सुखें – पहुडावं वाढवेळ
सारा विसरून खेळ

तुझ्या ओवीनं सांगावी – कधीं कथा पांडवांची
कधीं कृष्णसुदाम्याची

तुझ्या ओवीनं दावावी – कधीं सीता वनवासी
कधीं अंजनी तापसी

तुझ्या ओवीसंगें जावं — कधीं आजोबांच्या कुशीं
कथा ऐकाया गोडशी

तुझ्या ओवीसंगें जावं — कधीं मामाच्या वाड्यांत
घोड्यावरून थाटांत

गीत ऐकतां, रंगतां — झोप यावी गोड, गाढ
तुझ्या पदराच्या आड

आनंदानें नहालेले — असे सुखाचे दिवस
झाले दिवाळीपारिस !

*　　　*　　　*

आज थोरपणीं आई ! — कांहीं उणं नाहीं मला
सुखें संसार चालला

तुझ्या आशीर्वादबळें — धनदौलत, संतत
मानसन्मान लाभत

परी जीवनीं धांवतां — ठेंच लागतांच कधीं
पाणी उभं डोळ्यामधीं

सारा व्याप सांडूनिया — वाटे धुंडाळावं तुला
मांडी मागावी उशाला

आणि विसरून जग — तुझ्या पदराखालतीं
घ्यावी निवान्त विश्रांती !

---

# घंटांची किणकिण

[ जाति : चन्द्रकला ]

किणकिणती घंटा    चमकत्या घुङ्गुरमाळांत
रांग वाहनांची    चढत ही चढणी थाटांत....

टळूनिया गेली    गुरांच्या धारांची वेळ
क्षितिजावरि आला    रुपेरी चंद्राचा गोल !

झाडाझाडांच्या    कमानी काळवंडलेल्या
अंगुलि रंगाच्या—    सुधेच्या, तयांवरी फिरल्या

घाट-पायथ्याला    झोपलीं कृष्णेचीं खोरीं
पांघरून अंगीं    रेशमी चादर चंदेरी

रानफिरू वारा    गस्तवाल्यापरि दे भेट
शीळ ओळखीची    वाजवी वेळूचें बेट !

वडावरी कोठें    पांखरूं मधून शब्द करी
भंग शांततेचा    करी ती भेदक ललकारी

रखवालीवाला    राहतो झाडीच्या टोंका
मिणमिणणारा हा    दूरचा दिवा तेथला का ?

शांत घाटमाथा    वळणही घाटाचें शांत
गाड्यांची रांग    निघाली तेथुनि थाटांत

—रवंथ करणारे    चालले संथपणें बैल
गाडिवान बसले    काढण्या सोडुनिया सैल

चकमक काढुनिया  कुणी घे चिलमीचे झुरके
तान कुणी घे, ती  सर्वही घाटावरि फिरके !

खळगा आदळतां  कण्याचे कंदिल हिंदळती
थरथरती ज्योती  क्षणानें शांत तेज देती....

घरघर करणारें  कधीं ये विमान आभाळीं
गा डी वा नां च्या  क्षणभरी आठी ये भाळीं

ओलांडुनि त्यांना  यंत्र तें झर्णी पुढें जाई !
कुठें, कशाला, कां ?  खंतही याची त्यां नाहीं

शांतपणें पुढची  चढति ते चढणी नादांत
किणकिणती घंटा  कधींच्या घाटाघाटांत !!

---

# मळणीच्या दिवसांत

[ छंद : ओवी ]

मळणीच्या दिवसांत
आला होतास पैऱ्याला
राया ! आमुच्या शेताला १

संगसंग मिळुनिया
केली काढणी मोडणी
आणि पिर्तीची पेरणी ! २

शेजारच्या ओढ्यावरी
खाल्ली भाकरचटणी
एकपंगतीं बसूनी ३

—कशालाशी धांवतांना
सड बोचला पायांत
रक्त भळाभळा जात ४

माझी जखम देखून
तुवां येऊन धांवत
पाय घेतला हातांत ५

वण माझ्या पावलाला
हात तूझा पण कांपे !
माझं देहभान लोपे ! ६

नव्याकोर मुंडाशाची
चिंधी तुवां रे फाडली
धार रक्ताची थांबली ७

उडल्या कीं राघूवाणी
क्षण गेला तो निघून
घाव जन्माचा घालून ! ८

...

लइ दिसाच्या पिर्तीची
एकुलती एक खूण
चिंधी ठेविली जपून ९

मळणीचे दीस आतां
राया ! वर्साला येतात
आणि निघून जातात !! १०

---

# कां दिवा नसे ?

[ जाति : नववधू ]

“ आकाशदिवे हे घरोघरीं
कां दिवा नसे आपुल्या घरीं ?
आज दिवाळी नाहीं का ग ?
नाना गेले करुनी राग
बोलसि यापरि,—मजला सांग
का सणास येतिल आज घरीं ? १

नवे न देसी कपडे ल्याया
खाऊ किंवा गोड खावया
चंद्रज्योति ना मज फुलबाज्या
मीं केलें ऐसें काय तरी ? २

दारोदारीं दिवे उजळले
हंसतिखेळती सौंगडि सगळे
अंधारांतचि बसुनि नाकळे—
कां धरुनि ठेविसी मला उरीं ? ” ३

अजाण बालक वदतां यापरि
अवसेच्या त्या घन अंधारीं
चिंताच पेटे तिच्या अंतरीं
आक्रोश करी मन परोपरी ! ४

—म्लान परी ‘ कुलदीपक ’ पाहुनि
क्षणांत हंसली डोळे टिपुनी
वदे—“ आणितें पणती लावुनि
मी खुळी विसरलें कशी पुरी ! ” ५

# भास—

[ छन्द : ओवी ]

[ एका खेडेगांवांतील एका म्हातारीचा एकुलता लेक सोबत्यांच्या नादानें पलटणीत नांव दाखल करतो. पुढें त्याला लढाईसाठीं परदेशीं जावें लागतें.... दिवाळीच्या आधल्या रात्रीं म्हातारीला मुलाची अतिशय आठवण होते.... झोपेंत तो परत आल्याचा भास होऊन ती म्हणते....]

" सात समिंदरापार — गेला व्हतास लडाया
अता अचानक असा — कसा आलास लाडक्या !

तुजा कालचा कागुद — बघून म्या म्हणितलं—
अता कशाचं सणाला — माझं येतंया सोनुलं

पर आलास, ठिवून — सय माजी म्हातारीची
घरीं एकली मी, तेची — याद हाय म्हणायाची !

माजा नवसाचा देव — न्हाइ खोटा पडायाचा
कर त्येला दंडवत — लाव भंडारा र त्येचा !

अन् इक्ती रात कां र ? — नग सांगू.... वळखलं—
साइबानं रजा देतां — न्हाइ तुला राहवलं

टुकडा बी न्हाइ कसा — वत्राळून म्या टाकिला ?
खूळ भरलया जनू — अता तुज्या म्हातारीला !

किती वाळलास राजा ? — कोण मायेचं र तिथं ?
पूस डोळं.... मला न्हाइ— — म्हातारीला राहवत....

अता नग ती लढाइ — पुना कशाला जायाचं
' काळी ' आपली कसावी — न्हाइ उणं पडायाचं !

आन ' लक्षुमी ' घराला — करूं थाटानं लगीन
सुनमुख बघायाला — माजं भुकावलं मन

—कां र उठून तूं उभा ? थट्टा केली....बस खालीं
कां र निघालास ?....कुठं ? अता येळीं नि अयेळीं ?

"न्हाइ रजा" म्हणतूस रहा सकाळपातूर
माज्या येडपीच्या संगं घडीभर बोल की र

—बाळा ! होऊं दे सकाळ बोट लावून तेलाचं
अंग चोळून घालते तुला न्हाया दिवाळीचं

'पाठपोट थंड होउ औक्षवंत असा बाळ'
असं बोलून एकदा ववाळूं दे तुजं भाळ !

तुला लई आवडते सारणाची र करंजी
अता सकाळच्या पारीं देते करून—खा ताजी

पिकलं हें पान अता गळूनच पडायाचं
त्याचं शेवटचं कोड नाहीं का र पुरवायाचं ?

न्हाइ आइकत माजं ?.... करूं नये राजा असं !!
काळजाची आण माज्या.... काय—तरी बी जातूस ?"

* * *

माउलीच्या नयनांना लागे आसवांची धार
जाग आली क्षणामध्यें जातां भिजून पदर

भंवतीच्या काळोखांत पाही भरल्या डोळ्यानं
कुठं दिसतो का बाळ आसमंतात् म्हणून

सारा अंधार अंधार अंवसेच्या आधीलचा
किती माजला भयाण ! अंत लागेना तयाचा !....

दिवाळीच्या दिवलींत मिणमिणणारी ज्योत,
तिज दिसे क्षणक्षणां चाललेली मन्दावत !

---

# विरहानंतर....

येणार तूं-कळतांच माझें मन वेडावलें
मला रोज रोज पुसे– 'किती दिवस राहिले?'

येणार तूं–कळतांच नेत्र म्हणताती मज
'तुझ्या हरीणीचे डोळे आम्हां आणितील लाज!'

येणार तूं–कळतांच प्रज्ञा–स्फूर्ति मंदावली
कलादेवता शारदा जणूं यावया निघाली!!

आणि येतांच तूं दारीं फुलली ग फुलबाग
गाती कोकीळ, सारिका आज नवे नवे राग

येतांच तूं ओटीवरी तुज पोपट बोलला,
'यावें, यावें महाराणी! आज आपुल्या घराला'

येतांच तूं माजघरीं फणी-कुंकवाची पेटी
क्षण हांसली हळूंच गंहिवरोनिया पोटीं....

येतांच तूं शेजघरीं उसळल्या उष्ण लाटा
लाख विजेचीं पांखरें गेलीं चावूनिया चित्ता!

येतांच तूं कोमलांगी! माझ्या मनाच्या मंदिरीं
ऊन सोन्याचें सांडलें आल्या श्रावणाच्या सरी!!

---

## बाळ श्रीकान्त !

माझ्या श्रीकांताचे डोळे
नील प्रकाशाचे कळे
त्यांच्या दिव्य लकाकींत
सारा संसार उजळे ! १

किती नाजूक नाजूक
लाल ओठाची पाकळी
कशीं उघडीं पडलीं–
रत्नं....माणिकं पोंवळीं ! २

बाळ श्रीकांताची कांति
सोनकेतकीची पात
चैत्रपालवी आंब्याची
तळपाय, तळहात ! ३

माझा श्रीकांत हांसतां
घरादारांत प्रकाश
माझा श्रीकांत खेळतां
वंशवेलीचा विकास ! ४

हांस हांस रे राजसा !
हांस मोहक मंजुळ
गृहसुखाचा ओहळ—
वाहूं दे रे खळखळ ५

तुझ्या हांसत्या ओठांत
प्रीतिसुखाची पूर्णता
तुझ्या झांकल्या मुठींत
बद्ध आम्हीं उभयतां !! ६

# मोट चालली मळ्यांत—

[ जाति : "सूर्यकांत" (समुदितमदना) ]

मोट चालली मळ्यांत करितें चाक तिचें कुरकुर
गीत ऐकुं या बांधावरुनी, चला राव क्षिनभर....

मोट वरी ये भरुन, कशी गरगरुन डौल ये तिला
डोणेवरती, रिती होत ती, करीत बरसातिला
डोण तुडुंबे -आणि उसळतें पाणी घेई उडी
सहस्रधारा कोसळती, त्यां इंद्रधनूंची कडीं
थुइथुइ नाचत पाटामधुनी चाले जळ धांवत
वासुदेव का चाळ बांधुनी टाळ वाजवी इथं ?
पाटाजवळी गेंद झेंडुचे, गुलाब पिवळा खुले
जळदेवीला मखमल वाही लाल आपुलीं फुलें !
धावेवरती बैल धांवती मोटकरीही पळे....
मागें यावें, पुढती जावें, अखंड हें चाललें !!
फुलें देखुनी खुले मोटकरि, गाइ गीत दिलभर
गीत ऐकुं या बांधावरुनी, चला राव ! क्षिनभर.... १

शिवेपावतर शिवार सारं गेलं हिरवाळुन
धरती टाकी गरतीवाणी सकल अंग झांकुन !
शिवारांतला ऊस रंगला,—पहा पहा फुलवरा
'नका दिठाळूं पिका' विनविती लवुनि मक्याचा तुरा !!

हळद दिसे ही, जणूं कुलवधू हळद लावुनी बसे
कातरलेल्या एरंडांचे मंडप सजले कसे !
बांधावरती आडदांड हा पसरे दुधभोपळा
गवार, भेंडी उभी बाजुला, फुलवर जोगावला
शाळू—आंबा कुठें, त्यावरी राघूची पैरवी
आंबेराईमधें पलिकडे पांवा कुणि वाजवी
कान उभारुनि गान ऐकतीं माळावरलीं गुरं
गीत ऐकुं या बांधावरुनी, चला राव ! खिनभर....२

हिंदभूमिच्या शेतकऱ्याची जिवंत ही दौलत
प्रसन्न हंसरी, लक्ष्मी दुसरी, माता श्रीमंत !
या मातेचा, श्रीमंतिणिचा पुत्र लेइ पटकुर—
मोटकरी तो, बघून का हें चाक करी कुरकुर ?
चाक कुरकुरे तरी मोटकरि गाइ लावुनी सुर
चला ऐकुं या " गौळण " त्याची, चला राव खिनभर....३

---

# माझा पानमळा....

[ चाल : लोकगीताची ]

माझा पानमळा— पानमळा !

इथुन् तिथुन् काळीशार होती धरणी
मी, वाफे पाडुन् कांडे मोडुन् केली पेरणी
अंकुर कवळाऽ कवळाऽ....कवळा कवळा— १

दिवसामासापरी अंकुर वरी वरी वाढे
नागवेल शेवरीवरी विळखा मारी आणि चढे
पिकला सोनसळा....सोनसळा— २

मध्यें सोनकेळीं त्यांची कळी बघा खुलली
लेकुरवाळी नारी, हिरवी साडी देवी ल्यायली !
बोला "चांगभला"...."चांगभला"— ३

'कापुर् ओळ्यावर' माझी विहिर् काय नखरा ?
बादशाहि चार मोटा चालती, खोटा—नाहीं झरा !
पाणी कावळ्याचा डोळा....अहो डोळा !— ४

समुद्या शिवारांत जित्रापांत मळा झुले
हा पंख पिसारुनी खुल्या मनीं मोर डुले !
दिल् तर हरखला....हरखला ! ५

धरतिची केली निगा कशी बघा देवापरी
कमि नाहीं दौलतीला लक्षिमीला आणिन् घरीं !
बढती माझ्या कुळा....माझ्या कुळा ! ६

या, राव ! बसा तरी देतों घरीं मुंबईखुडा
द्या घरधनीणिला रंगवायाला ओठकडा !
तुमचा पिकेल् मळा....पिकेल् मळा !! ७

# तळ्यांतील कमळें

[ गद्यकाव्य ]

त्या तळ्यांतले ते असंख्य लहान-मोठे मासे नाचत होते.

त्या तळ्यांतलीं तीं मनोहर कमळं हंसत होतीं.

वर विमानांची एकसारखी प्रचंड घरघर चालू होती.

मनुष्य निसर्गावर ताण करून

एखाद्या पांखरासारखा हवेंत अधांतरी हिंडत होता.

....पंख नसतांनाहि—

आणि, बरोबर कितीतरी मण लोखंड घेऊन !

मनुष्य हवेंत झुंज खेळत होता.

—तळ्यांतले मासे नाचत होते. कमळं हंसत होतीं.

:: :: ::

वर भिरभिरणाऱ्या एका विमानांतून एक बॉंब—एक अणुस्फोटक बाहेर पडला. मोठ्या जलदीनं खालीं चालला होता तो.

हवेला घासून तो कोसळत असल्यामुळें

स् स् स् स्— आवाज निघत होता.

"खालीं नटून थटून राहिलेल्या साऱ्या जीवनसौंदर्याचा विध्वंस मीं करणार" या मस्तींत तो बॉंब जणुं गर्वानं फूत्कारच टाकीत होता !

—तळ्यांतले मासे नाचत होते. कमळं हंसत होतीं.

:: :: ::

—बॉंब त्या तळ्याशेजारींच आदळला.

जीवजात हादरविणारा

त्याचा केवढातरी भयंकर स्फोट झाला.

हिरण्यकश्यपूच्या उदरांत नखें रोवून नारसिंहानं फोडलेल्या विराट आरोळीसारखा—

वाटला तो आवाज !

बॉंब जमिनीच्या कोथळ्यांत शिरतांच

मातीचा एक प्रचंड तट एखाद्या डोंगरासारखा वरतीं उसळून आला.

आणि आपल्या अंगाखालीं

त्यानं तें विस्तीर्ण तळं

नामशेष करून टाकलं.

इच्छित कार्य पार पाडून

मोठ्या समाधानांत तो बॉंब तिथं पहुडला होता.

:: :: ::

दिवस उगवत होता.

मावळत होता.

सूर्याचा तासकांटा

आकाशाच्या तबकडीवर

कितीदां तरी फिरून गेला.

पाणकळा सुरू झाला; पर्जन्यकाळ सुरू झाला.

बॉंबनें आपल्या सामर्थ्यानें तयार केलेल्या तळ्यालगतच्या त्या अवाढव्य खांचेंत पाणीच पाणी झालं होतं आतां....

जणुं तळंच झालं होतं तिथं!

आणखीही कांहीं दिवस गेले.

बॉंबचा लोखंडी प्रचंड तुकडा पाण्यानं गंजून गंजून झिजत होता....

आणि—

—तळ्यांतले मासे नाचत होते. कमळं हंसत होतीं!!

---

# अनाथ अर्भकास—

[ गद्यकाव्य ]

हे अनाथ अर्भका ! हे अनिकेत अपंगा !!

तूं या कचऱ्याच्या पेटींत येऊन पडला आहेस.

गतप्राण झाला आहेस.

जगांतील सारी घाण जेथें येऊन पडतें तेथें तुझा पुष्पकोमल देह दिसतो आहे ! जग सणासुदीसारखें आनंदांत रममाण झालें आहे आणि तूं....

तूं येथें येऊन पडला आहेस !

बाळा ! तुझ्या बालदेहाच्या भोंवतीं देवानं घातलेलं वारेचं आवरणही पुरतं दूर झालं नाहीं, तोंच तुझ्यावरचं मायेचं पांघरूण कोणी रे दूर केलं ?

कुठें 'गृहरत्न' म्हणून चमकण्याऐवजीं तूं या ओसाड खातेऱ्यांत काळवंडून पडला आहेस.

मातेच्या मृदु स्तनाग्रांतून निघणाऱ्या मधुरोष्ण दुधाच्या धारांनीं जे ओठ आणि जी जिवणी भिजावी—-

ती चिखलमातीनें माखली आहे !

बालका ! काय पाप केलं होतंस गतजन्मीं,

कीं, तुझ्या पापण्या क्षणैकच उघडल्या आणि मिटल्या ? कुणा पूर्वजन्मींच्या वैऱ्याच्या वंशांत का तूं जन्म घेतलास ?

कां—

कोणा अनाथ बालविधवेच्या निष्पाप पापाचं प्रायश्चित्त तूं भोगतो आहेस ?

कां,—कोणा आधुनिक कुंतीचा अपराध

तुझ्या माथ्यावर आदळला आहे ?

कां,—कोठें अनिरुद्धपणें अवतरण्याचा तुझा प्रयत्न

रक्तरंजित झाला आहे ?

कां,—गांजलेल्या आणि गंजलेल्या कोणा भुकेकंगालाच्या दुष्काळांत घोंडा महिना तूं झालास आणि........

छेः छेः छेः मानवजात इतकी निष्ठुर,

इतकी निर्दय,

इतकी निर्लज्ज

नाहीं रे !

जिच्या उदरीं तूं वाढलास ती माता तुला दूर लोटील किंवा लोटूं देईल ? छे, माता ही किती त्यागमयी प्रेममयी मूर्ति आहे. मानव हा किती प्रेमळ, सदय आहे !....माझे सारे तर्क खोटे आहेत !

....मग, तूं इथं कसा आला असशील बरं ?

चिखलांत कमळ उगवतं म्हणतात;

तूं या कचऱ्याच्या पेटींत उगवला तर नाहींस ना ?

पण—तुझ्या देहाभोंवतीं माणसानेंच गुंडाळलेला कापूस दिसतो आहे !....जाऊं दे तें !

—बाळा ! तुझे ओठ कां रे हलत आहेत ? मातेच्या दुधासाठीं ?—कां, ज्यानं जन्माला घातलं त्या ईश्वराला शिव्याशाप देण्यासाठीं ?

—बाळा ! तुझं अंग कां थरथरत आहे ? मायेच्या उबेसाठीं ?—उबेसाठीं ?

नाहीं....हा भासच झाला सारा. तूं येऊन लगेचच परत गेला आहेस. तुला आल्याबरोबर परत पाठविण्यांत आलं आहे !

जा—जा, सुखानं जा !

एखाद्या अनाथाश्रमांत दीनवाण्या मुद्रेनं वाढण्यापेक्षां

त्या देवाजवळ जा

आणि त्याला टाहो फोडून सांग,—

" देवा, तुझ्या जगाची घडी अजूनही नीट बसलेली नाहीं ! "

---

# अबोध हुरहूर

दिपतील दिशा असा जरी बाहेर प्रकाश
एक कोपरा मनाचा माझ्या अंधुक उदास १

शीळ मंजुळ घालीत फिरे वसंताचा वारा
तरी मिटल्या कळीचा कोश उमलेना पुरा ! २

उभीं सतत पाठीशीं जरी मायेचीं माणसें
माझें चित्त सांगे मला 'मला हवें तें ना दिसें' ३

खाद्य-पेय-दृश्य-श्राव्य हात जोडिती सेवेसीं
आणि त्यांची सेवा मला वाटे मधेंच नकोशी ! ४

सुखें सारीं भंवतालीं तरी नाहीं समाधान
असें कसें घडवीलें देवा ! तुम्ही माझें मन ? ५

वाटें, माझें परब्रह्म— पैल यमुनेच्या तीरीं
उभें राही नादवीत गूढ मधुर बांसरी ६

उडी घालणें पुरांत, धैर्य नाहीं तें उरांत !
मन लावितें माघारीं मृगजळाच्या घरांत ! ७

परी नाद-साद येई कधींमधीं वाऱ्यावर
आणि जागी होई पुन्हां जीवघेणी हुरहूर !! ८

---

# कार्तिकाच्या प्रदोषकाळीं !

कार्तिकाच्या प्रदोषींचा
आज दिसला नीलिमा,
आणि हास्य अंकुरलें
मानसींच्या रोमरोमां ! १

दिवसाच्या कामधामीं
शिणलेल्या देहमना
शुद्ध नीलिमा पाहून
शुद्ध आनंद झाला ना ! २

नाहीं वाऱ्याची चाहूल,
नाहीं मेघांची गर्जना,
नाहीं धुळीचे पर्वत,
नाहीं विजेची वल्गना ! ३

नाहीं रात्रींचें काजळ
लिंपलेलें कोनाकोनीं,
नाहीं चंद्रम्याची स्वारी
आतां सांगत कहाणी ! ४

नाहीं चांदण्यांचे खडे
आतां खुपत नयनां,
नाहीं भस्माचा तो पट्टा
मंदाकिनीचा देखणा ! ५

दिसतसे आज पुढें
निळें निर्मळ आकाश,
जणूं क्षाळिलें हें कोणीं
स्फटिकानें सावकाश ! ६

साधूच्या हें मनावाणी
किंवा 'प्रिय' प्रीतीवाणी
चहूंकडे-चहूंकडे
दिसे निर्मळाचें पाणी ! ७

पृथ्वी, आप, तेज, वायू,
चारीं राहियलीं दुरी,
एक निर्मळ आकाश
उभें देवाचिया द्वारीं ! ८

—आकाशींच्या अंतरींचा
असा दिसला नीलिमा,
आणि हास्य अंकुरलें
मानसींच्या रोमरोमां ! ९

---

# महात्म्यांचें रक्त !

बालकाचा पिंड
पोसावयासाठीं
उष्ण मधु स्तन्य
निर्मावयासाठीं
वेंचावें लागतें
माउलीचें रक्त !
माउलीचें रक्त !

मानवतेच्या या—
बालपणीं तिचें
पोषण-वर्धन
करावयासाठीं
सांडावें लागतें
महात्म्यांचें रक्त !
महात्म्यांचें रक्त !!

—

## स्फुट कणिका....

### १ परीक्षा

आयुष्याची प्रश्नपत्रिका घेउनिया हातीं—
बसतो मानवप्राणी उत्तर लिहावयासाठीं
—वेळाचें त्या भान नुरे, हो शेवटची घंटा !
निर्दय कोणी, घे हिसकोनी अपुराची ‘ पेपर ’
अन् आज्ञापी, “ चालूं लागा वर्गाबाहेर ! ”

### २ न्याय

कोसळतो पाउस कुठें डोंगरावरतीं
अन् कुणा नदीला अवचित येते भरती
—वाहुनिया जाई मुंग्यांचें वारूळ....
त्या सहस्र मुंग्या तडफडती, हा देवा !
हा न्याय कुणाचा ? कुणी कसा सांगावा !

### ३ आतां आणि तेव्हां :

ही अमाप दुथडी भरून वाहे सरिता
तट खचून गेले जळ आवरुनी धरितां
ही सरिता कसली, सागरिका ही दिसते !
कुणि म्हणेल का हो ! इथें पांखरें मेलीं—
तडफडुनि जळाविण तृषार्त एके काळीं !!

## ४ उःशाप !

तो देव दयाळू त्याच्यावरि कोपला
अन् शाप घोर हा प्रभुनें त्याला दिला—
  " रे ! प्रीति-विवाहचि होइल जगतीं तुझा ! "
उःशाप मागतां त्यानें आक्रंदुनी,
प्रभु हंसुनि म्हणे, " जा, घटस्फोट होइल ! "

## ५ मीलित ( अलंकार )

तो विडा खाउनी रंगमहालीं आला
अन् तिच्या कपोला चुंबचुंबुनी गेला....
  नवलज्जेनें ते अधिकचि झाले लाल
त्यामुळें सख्यांच्या ध्यानीं मुळिं ना आले—
जे लाल विड्याचे ठसे ' तिथें ' उमटले !

## ६ प्रेमचौर्य

' चोरटा ' जरी गे ! तुझा प्रेमव्यापार—
तरि खन्त तयाची कशास करिसी फार ?
  —रतिदेवा असले आवडताती चोर !
अन् मदनावाणी ' वकील ' असल्यावरती
जाशील ' सुटोनी ' नुसत्या ' लग्ना'वरती !!

## ७ स्त्री खरी लाजते

स्त्री खरी लाजते एकदांच जन्मांत—
थरथरतां अंतर आणि ' चुड्याचा हात '
—जा, विचार तिजला रसिका उघड मनानें—
उठविते अंतरीं कशी कोटि आवाज
बोहल्यावरिल ती पहिलीवहिली लाज !

## ८ इच्छा

त्या परिस्थितीच्या तीक्ष्ण सहाणेवरतीं—
हें झिजत चाललें माझें जीवन–खोड !
जों चिडून घर्षण, तों तों अधिकचि झिजें
ही इच्छा कीं, तें ठरो न निंब-वडाचें
तें ठरो जगातें सुखकर, चंदनतरुचें !!

## ९ माझीं कवनें

बागेंत मनाच्या अनंत फुलतीं फुलें
उमटतीं तयांवर भ्रमरांचीं पाउलें
पाकळी हालतां–मरंद कोमल गळे....
जल गंधयुक्त तें ओसंडत अंतरीं
तीं कवनें माझीं....लहरींवर लहरी !!

# कांहीं क्षणिका....

## १ मोगरा फुलला !

वेल मांडवा पोंचली
आतां मोगरा फुलला....
देह साउलींत लोळे
मन सुवासाशीं खेळे !!

## २ मञ्जुळता

आकाशीं नितळ चांदणें असावें,
प्रीतीच्या मांडवाखालतीं बसावें,
मदन-सख्याला गुपित पुसावें,
आणिक मनांत उगीच हंसावें !

## ३ काजळ

काजळ लेवुनि तुझिये डोळे—
दाह शमविती तव, वेल्हाळे !
परंतु इकडे, माझें मात्र
अंतर अधिकाचि अधिकाचि पोळे !

## ४ तूंच शहाणी—

आज आपुली 'चकमक' झडली
मम नयनांमधिं आग पेटली—
तूंच खरी शाहणी म्हणावी,
नयनजलानें ती विझवीली !!

## ५ प्रचीति !

संसारामधिं स्त्री-पुरुषाला
" रथी-सारथी " कवि गौरविती....
दोघेही परि ' बैल ' रथाचे
अशीच येते कधीं प्रचीति !!

## ६ पोट म्हणे—

लाथामागुनि खाउनि लाथा
' पाठ ' निघाली तिंबुन-चिंबुन
' पोट ' म्हणे तिज, " माझ्यासाठीं—
माझ्यासाठीं घेई सोसुन !! "

## ७ जीवन म्हणजे—

जीवन म्हणजे असें असे हें
जसा रेडिओ शेजाऱ्याचा—
नको तेधवा ओरडताहे
हवा तेधवा गुपचुप राहे !!

## ८ न्याय

काय जगाचा न्याय पहा हा....
गरिबां न मिळे, देवासाठीं—
देव्हाऱ्याला, ' देवद्वार ' !
अन् धनिकांच्या स्नानगृहाला
स्वच्छ पांढरा संगमरवर !!

---

# पिंपळाचा पार

[ छंद : ओवी ]

पिंपळाचा पार पार कधींचा अंगणीं
हिरवींगार पानं गेला पिंपळ गगनीं

पिंपळाचा पार कोण झाडीत सकाळीं
कोण सडा टाकी गात देवाची भूपाळी ?

पिंपळाचा पार ताई खेळे पारावर
सागरगोटे तिचे— कोण उचलीतो चोर ?

पिंपळाचा पार गजबज कोण मांडी ?
गोपाळ-बाळ आज खेळत का दहींदंडी ?

पिंपळाचा पार पान करी सळासळा
' घेऊन सांजवात चल, आई पिंपळाला '

पिंपळाचा पार ' चला दादा ! पारावर
लव-अंकुशाची मला गोष्ट ऐकवा सुंदर ! '

पिंपळाचा पार पारापाशीं चांदण्यांत
हुतूतूचा डाव आला कोणाचा रंगांत ?

पिंपळाचा पार शीळ घुमे पाराभोंतीं !
बघते ही चपापून पोर कोण उमलती !

पिंपळाचा पार पारापासून चालला
घोडा कोणाचा गांवाला ? पाणी कोणाच्या डोळ्याला ?

*  *  *  *

पिंपळाचा पार चिरा चिरा निखळला !
दिसतो पिंपळ हा आज वठला ! वाळला !

पिंपळाचा पार........" पिंपळीं बारा भुतं "
जन सांगती मजला, " नको पांथा ! जाऊं तिथं ! "

## नवलाईचें चांदणें !

[ जाति : केशवकरणी ]

१

नवलाईचें पडे चांदणें माझ्या ओटीवर
उजळिलें त्यानें माझें घर !
अंधाराची रात्र म्हणुनि मी बसलें होतें घरीं
निराशा करीतसे बावरी
दिवेलागणी टळून गेली—'वाड्या'वरचा दिवा
लुकलुके छोटासा काजवा !
वेस बंद व्हायची, उडाली तोफ, तीहि ऐकिली
चांदणी व्याधाची देखिली
मन बावरून हें गेलें बाई अती
थरथरा जिवाच्या ज्योती या कांपती....
मज कळेचिना मी काय करूं एकटी ?
तोंच कोठुनी आले, हंसले चंद्राचे प्रिय कर
उजळिलें त्यांनीं माझें घर !

२

घर कसलें तें, अरण्य होतें सख्यासुंदराविना
माझिया प्राणपांखराविना !
परी चंद्रिकेसवें उजळतां झालें तें मंदिर
प्रभूचें शिवालयच सुंदर !
पणती नव्हती तिथें झळकली सहस्रदीपावली
लकाकी त्यांची ती आगळी
उजाड रानीं नवहास्याची वर्षा ओसंडली
सुखाची वेली मोहोरली

काळोख पसरला साऱ्या विश्वावरी—
चांदणें परी मम घरीं, उरीं, मंदिरीं !
ही कसली अद्भुत माया, जादूगिरी ?
कोण हंसे ग बाई ? हां, हां, ओळखिला मीं स्वर....
उजळिलें ज्यानें माझें घर !

३

" परतायाचें केव्हां झालें घरीं रणामधुन ?
निघालां घामानें न्हाउन. "
" चंद्रहार आणिला तुझ्यास्तव लुटींतून मोहिनी
पाहुं दे कंठीं तव घालुनी "
" चंद्रहार राहुं दे, कथा, कां वाढवेळ जाहला ?
कधींचा ' पाणकळा ' लागला "
" कृष्णेच्या भर पुरांत घोडा तुजसाठीं घालुनी
जलदिनें आलों ना साजणी ! "
मग, हंसला माझा चंद्र मोकळेपणें
अभिमान शोभला जगतीं ज्याच्यागुणें
तो ठेवि बाजुला खड्गाचें खेळणें !
दावी मग मज पराक्रमाच्या खुणा सख्याचा कर !
उजळिलें त्यानें माझें घर !

———

# कधीं वाटतें

कधीं वाटतें, सोनकेळिच्या—
पानांवरचें दंव चुंबावें
आणि उषेचें हीरकमोतीं
उरीं अंतरीं वेंचुनि घ्यावें ! १

कधीं वाटतें फुलपांखरूं
बनून पुष्पांवरी फिरावें
मधुरस आंतिल चाखित चाखित
मधुतर गायन गात रहावें २

कधीं वाटतें, बालरवीचा—
सोनकिरण मी होउनि जावें
आणि मुलांच्या आणि फुलांच्या
गालांवरतीं खेळ करावे ! ३

कधीं वाटतें, तव " केसांचें—
रेशिम " मुखि पांघरुनी घ्यावें
वीज तयांतिल, प्रीत चेतविल
सुखांत गुंगत जग विसरावें !! ४

———

# राधिके !

पाणवठ्यावर जाशी गऽऽ तूं
पाणवठ्यावर जाशी ग !
सूर्य उतरला रथाखालतीं
चंद्राची हो सरशी गऽ
शिरीं तुझ्या हा घडा मातिचा
त्यावर इवली कळशी ग
हंसगामिनी अशी कामिनी
अजि चंचल कां ठुमकशि ग ?
संशय कसला मनांत तुझिया
वळणावर कां वळशी ग ?
पथींच थांबुन, मुरकुन मुरडुन
कवणातें तूं बघशी ग ?
तुझेच पैंजण करिती रुणझुण—
मुरलीचा रव म्हणशी ग !
श्रीहरि कोणी घडा फोडुनी
भिजविल भीति मानिशि ग ?
भिजलें मन....अन् भिजेल तनु, ही–
खंत कशाला करिशी ग ?
तूं....पाणवठ्यावर जाशी गऽऽ

---

# दारिं उमलली कळी !

[ जाति : सृष्टिलता ]

दारिं उमलली कळी
माझिया—दारिं उमलली कळी !
वेल लाविली जपुनी, खपुनी
कुम्पण माण्डव दिले उभवुनी
तळीं ओतल्या, कावडींतल्या उदकाच्या ओंजळी !

प्रौढ वधू जणुं वाढे दिनदिन
मृदुल तणारे, मृदुतर जीवन !
मातृपदाच्या श्रीमंतीची कांति मुखीं विलसली.

—अवचित इवली कळी लटकली
चंद्रकोर क्षितिजांत प्रकटली
वनराईच्या आनंदाची सीमा कुणि रेखिली !

कोश कळीचा फुलतां कोमल
उधळित नाजुक साजुक परिमल
हृदय खुलें दावील करोनी एक एक पाकळी....

नकोत आतां रत्नमाणिकें
नकोत लालस चमकतीं सुखें,
रूप-गंध-रस मूर्त प्रकटले फुलवंतीच्या कुळीं !

आतां माझे हारपले श्रम
सुफलित झाले हेतु मनोरम
निर्मितिचें साधलें श्रेय, जें—श्रेष्ठ सकल मंगळीं !!
दारिं उमलली कळी—माझिया—दारिं उमलली कळी !

---

## त्यांच्यासाठीं—

[ छंद : देवद्वार, ( अभंग ) ]

अंगणींच्या सान लतिका–फुलांना
प्रेमें पोसतांना— कधीं कधीं
अंतरींचा कोणी गाई अन्य गीती
अशरीरिणी ती ऐकूं येई !....

" द्या हो मज कोणी पाकळ्यांचे पंख
टिपावया दुःख पीडितांचें—
" भावनांचे तन्तू द्या हो द्या सहस्र
विणावया वस्त्र त्यांच्यासाठीं—
" द्या हो मज कोणी चांदण्याचे स्वर
गावया सुस्वर त्यांच्यासाठीं—
" क्षण द्या हो मज मेघांचें हृदय
झांकावया सूर्य त्यांच्यासाठीं ! "

---

# समाधान !

[ मुक्तछंद ]

हॉटेलामधून बाहेर मी आलों—
अन्नाच्या मस्तींत धुंदींत, सुस्तींत
चघळीत मुखीं पट्टी मसाल्याची गुंजेच्या पानांची अत्तरवासाची.

पिंक टाकावया वळलों किंचित एका बाजूस
तोंच दिसों आलें नागडें उघडें भिकाऱ्याचें पोर
आंधळ्या आईच्या शेजारीं तें उभें !
दीनवाणेपणें माझ्याचकडे पहात होतें........
दीनवाणेपणें मजलाच तें म्हणत होतें........
' पैसा द्या दादा ! ' ' पैसा द्या दादा ! '

लेकराची वाणी उमटतां क्षणीं
बिनबुबुळांच्या मातेच्या नेत्रांनीं ' दाता ' देखावया तडफड केली !
आणि पापण्यांची उत्साहाची पण केंविलवाणी फडफड झाली ! !
' छे: काय हे लोक हॉटेलाच्या कसे अगदीं दाराशीं '
म्हटलें मी मनीं........
आणि नितुक्यांत मेंदूच्या भंवती
उठले अनंत संज्ञाप्रवाह
आणि ते म्हणाले—
' चल ने रे त्यांना हॉटेलांत, आणि—
खायाला घाल यथेच्छ आकंठ
............तुझ्याइतुकें तुझ्यासारिखें ! '

संज्ञाप्रवाहांच्या आवर्तांत त्या घाबरा झालों मीं........
तितुक्यांत माझी पाठीराखी बुद्धि हळूंच म्हणाली :
' अरे एक पैसा फेक त्यांच्याकडे, आणि चल पुढें. '
चामडी खिसा उघडला गेला—
चुरचुर झाली हिरव्या नोटांची—
खळखळ झाली पांढऱ्या नाण्यांची—
पण बोटांनीं, हुशार बोटांनीं, अचूक शोधला तांब्याचा पैसा
अन् भिरकावला तो
पोराकडे आणि आंधळ्या तयाच्या माउलीकडे !
चाललों पुढें मीं........
चघळीत मुखीं एक पैशाच्या पानपट्टीची ' लाल लाल पिंक '
चघळीत मुखीं एक पैशाचें ' समाधान'ही ! !

—

# रात्रपाळीचा मजूर

दिवस मावळे, थकलीं गात्रें—
वाट घराची दिसते डोळां !
रात्रपाळिचा जादा पैसा
हवा परंतु मिळवायाला !

—मनानेंच ये घरास जाउन
तिजला खेटुन, त्यांना भेटुन
तेल घालुनी मग यंत्राला
म्हणतो, "दुसरा 'दिवस' लागला!"

---

# मोहोळ

[ जाति : दिण्डी ]

किर्र झाडीच्या दाट जङ्गलांत—
भिल्ल नित्यापरि फिरे टेहळीत
दिसे मोहळ फांदीस छानदार
लवे फान्दी ती, साहवे न भार !

फुलामागें शोधूनिया फुलास
सांठवीती मधु करुनिया प्रयास
अशा मधमाशा मोहळावरून
घरें बान्धुनि संसार करिति छान.

—शुष्क काष्ठें, वाळला झाडपाला
झणीं भिल्लानें तेथ सांठवीला
रचुनी त्यांची अन् एक उंच रास
पेटवोनी ती देइ तत्क्षणास

आच माशांना प्रखर लागतांच
दूर जाया धडपडति त्या वृथाच
पङ्ख जळुनीया पडति चितेपोटीं
हाय ! तडफडती, भस्मसात होती !

काढुनीया मध मोहळामधील
विकत नगरीं नेऊन कुणा भिल्ल—

....सोय कोणाची कुठें तरी व्हावी
आणि तीस्तव किति जीवनें जळावीं !

---

## ‘ अबोली ’

[ जाति : लवङ्गलता ]

अनुरागांतुनि राग निघाला सहज बोलतांना
आणि थांबल्या तव वाणीच्या सखे ! मधुर ताना
प्रेमगोष्टि रागांत तुझ्या त्या बसल्या लोपून
आणि अबोला सुरूं जाहला तेव्हांपासून ! १

कोपानें तव अधर थरथरे, पडे मुरड त्याला
परंतु माझ्या देहीं इकडे हृदयकंप झाला !
अधर चाविसी किति, मजसाठीं देशि सुळीं त्याला
दंतव्रण त्या हा न साहवे; अन्यायचि झाला !!
कंप पावुनी स्फुरण दाविती दलें नासिकेचीं
नयनीं ये लालिमा नवाची—उधळण कान्तीची
हृदयामाजीं राग न मावे, उसळे बाहेर
गुज हें मजला कळविति तिथले प्रामाणिक हेर ! २

छे: छे: झाला कहरचि हा, पण बहर नवा आला-—
सौंदर्याच्या कमलाच्या या पाक पाकळीला !
अनुरागांतुनि राग निघाला सहज बोलतांना
उपकारचि हा वाटे माझ्या द्वाड लोचनांना

कथिलें मी-त्यां, ' अहो, अहो, ती रागवली आहे '
सहर्ष त्यांचें अमृतप्राशन परि चालू राहे !
त्या हर्षाचें हळूंच फुटतां हंसु मम ओठांत
कडकडली कीं वीज ' तिकडच्या ' इंद्रियगोटांत !! ३

अन् तीं स्फुरणें तडितेऐशीं पुन्हां पाहतांना *
कोप तुझा मी विसरुनि गेलों; असेंच होतें ना ?
— कुठवरि परि चालेल अबोला भीति मला वाटे....
चक्रवाक पक्ष्यांमधि येइल कमलपत्र मोठें !
तों, रस्त्यांतुनि ये ललकारी त्या फुलवाल्याची—
" घ्या हो, घ्या हो, वेणी कोणी गोड अबोलीची ! "

कटाक्ष फेंकुनि अवचित हंसलिस—हंसलों मग मीही
अंतरिंचा अनुराग प्रगटला सहज सहज पाहीं !

———

# पावसा ! ये असा

[ छंद–अचलगति : स्वैर ]

—पावसा ! ये असा    सरसरून सरसरून
ये वरून, रे भरून    ................
अंगणीं, रंगणीं    नाच गा, गीत गा !
सांड जळ चहुंकडे    शिम्प अमृत–सडे    १

—धरणिच्या जिवलगा    ये 'मृगा'! ये 'मृगा'!
थांबसी कां उगा
शिणविसी वाउगा—
धरणिला, तरणिला,    हृदयिंच्या हरिणिला ?    २

—शुभ्रताच लेवुनी    ही उभी तपस्विनी
पार्वती सती कुणी    ही तशीच मेदिनी
वाट पाहते तुझी    हिज न आस गा दुजी
हृदय दावि उकलुनी    जाय कीं दुभंगुनी....
जाय रे दुभंगुनी....    ३

—भेटशी तूं तदा—    विनळुनीच आपदा
हृदयिंचे हिच्या झरे    वाहुं लागती त्वरें....
एकनिष्ठ प्रेयसी    लाभली तुला अशी
धन्य पावसा जिणें    एक प्रेयसीगुणें !
—ये गड्या तांतडी    भिजव गा हिची कुडी
कडकडून भेटणें    हृदयिं हृदय ओतणें
नयनिं नीर वाहणें    धन्य उभयही जिणें
धन्य उभयही जिणें    ४

—पावसा ! ये असा    सरसरून, सरसरून !!

# त्याचा स्पर्श

[ सुनीत ]

हेमंतांतिल दीर्घ रात्र सरुनि येई उषःकाल हा
जागी हो सुखनिद्रिता वसुमती....आनंदमुद्रा पहा !
लोपे धूसरता, हळूहळु नवा येतो तजेला नभा
कौलारांवरुनी सुवर्ण वितरी नारायणाची प्रभा !

कांहीं पक्षिकुलें अजूनि दिसतीं निद्रेमधें गुंगलीं
आला सूर्य घरां परंतु न कशी चाहूल यां लागली !
घारी मात्र कुठें मधेंच फिरती घाईंत उंचावरी
गङ्गास्नान करूनिया परतल्या कोणा पुरन्ध्रींपरी !

सोनेरी हंसुनी प्रणाम करिती या कर्दळी नारळी
नांदे सुंदरता तशी सुजनता साऱ्याच भूमंडळीं
झाली काकडआरती....दुरुनि तो, ये चौघड्याचा ध्वनी
आलापी मधु ' देसकार ', सनई, आकाशवाणींतुनी....

—गेला येउनि देव काय न कळे आतांच पृथ्वीवरी
त्याच्या स्पर्शसुखांतलीच अजुनी रेंगाळते माधुरी !

---

# लमाणांचा तांडा

[ मुक्तछंद ]

—चालला चालला लमाणांचा तांडा
एका गांवाहून दुजा गांवाला
संपलीं येथलीं उसाचीं गुऱ्हाळें, संपला येथला अन्नाचा शेर
आतां दुजें गांव !
आतां दुजा मळा !!
चला पाहूं चला........
नवीन चाकरी, नवीन भाकरी ! १

—चालला चालला लमाणांचा तांडा
पाठीवरी सारें घेउनी बिऱ्हाड
मरतुकडीं हीं खंगलेलीं घोडीं
खंगलेले बैल........
यांच्या पाठीवर देखा हा संसार
चार चितींचीं तीं उभवाया घरें घेतल्या चटया
घेतलें खाटलें, ( त्यांचा हा पलंग ), घेतलीं गाठोडीं,
घोड्याच्या पाठीशीं उलटें खाटलें अन् त्यांत घातलें रांगतें मूल !
घेतलीं गाडगीं, मडकीं, डबडीं,........
( चुलीला दगड मिळतील तेथें—
नकोत ते ध्याया बांधूनिया संगें !!—)
घोड्याशेजारून संसारामागून रस्ता हुंगत हीं
धापा टाकणारीं चाललीं कुत्रीं २

—चालला चालला लमाणांचा तांडा
घोड्याशेजारून संसारामागून चालले बापई ! चालल्या बायका !

असंस्कृत मुद्रा....दीनवाण्या मुद्रा....अगतिक मुद्रा....
कटिखांद्यावरी यांच्याही लादलें ' संसाराचें ओझें '
पहा पाठीवरी बांधलीं बोचकीं
पहा काठीवरी आणखीही कांहीं
उरलासुरला बांधला संसार ३

चालला चालला लमाणांचा तांडा....
आणि तांड्यांतील, पाहिलीत कां ती एक लमाणीण
ओझ्यानें अगदीं वांकली आहे, थकली आहे
तिच्या खांद्यावर, तिच्या काठीवर
जड जड सारें गुळाचें गाठोडें, देवाचें गाठोडें बांधलें आहे.
-परी काठीच्या त्या एका टोकाला अन्
रा घू चा पिं ज रा बांधला आहे........
जीवानें जपल्या मायेनें पोसल्या राघूचा पिंजरा बांधला आहे....
अस्थिर संसारीं विकीर्ण जीवन
त्यांत एकली ही कोमलता—खूण !
-ओझ्यानें वांकल्या लमाणाच्या स्त्रीनें
डोळ्यांपुढें येई अशा रीतीनें हा बांधला पिंजरा
-तेवढीच तिच्या आत्म्याची ओळख....
मनाचें भोजन
तेवढीच तिच्या लमाणजातीच्या
मानव्याची खूण !! ४

—चालला चालला लमाणांचा तांडा
एका गांवाहून दुजा गांवाला....

---

## ऋण

[ जाति : सृष्टिलता ]

फिटेल कैसें ऋण ?
नाकळे, फिटेल कधिं हें ऋण ?

वाळवंटिंचें खरखतें उन्ह
मजस्तव हांसत माथां झेलुन
पोटीं ज्यांनीं मज कवटाळुन
वाढविलें निशिदिन;
तयांचें, फिटेल कैसें ऋण ?

गुम्फुनिया कर नित माझ्या करिं
संगें येती कुणि छायेपरि
घरीं, संगरीं, राजमन्दिरीं—
करित पाठराखण....
तयांचें, फिटेल कैसें ऋण ?

विसरुनि अवगुण आपुलकीनें
थोरपणाचें चढवुनि लेणें
शिलाच मीं, परि मज प्रेमानें
दिलें कुणी प्रभुपण....
तयांचें, फिटेल कैसें ऋण ?

मन्थुनिया रससागर कोणी
मज पाजियली अमृतवाणी,
नवज्ञानांच्या उघडुनि खाणी—
उभे सखे, सज्जन,—
तयांचें, फिटेल कैसें ऋण ?

—आणि, उदात्तासाठीं ज्यांनीं
जीवन ज्योतीपरी जाळुनी
अन्धारीं कधिं जातां बुडुनी
दिलें तेज पसरुन....
तयांचें, फिटेल कैसें ऋण ?

सातवार वा शतदा जन्मुन
फिटायचें का ऋण हें हातुन ?
आ नं दा नें माथां वाहिन
तेंच मला भूषण....
ना कळे, फिटेल कैसें ऋण ?

---

# छन्द्

छन्द् बहुत दुनियेमधीं या
छन्द् काव्याचा निराळा
छन्द् हा ज्याला कळाला
जीवनीं रस त्याला मिळाला !



# परिचय

## विनायक महादेव कुलकर्णी, एम्. ए.

( मराठीचे प्राध्यापक, लिंगराज कॉलेज, बेळगांव. )

जन्म, ७ ऑक्टोबर १९१७

### प्रकाशित साहित्य

| | | |
|---|---|---|
| न्याहारी | ( जानपदकथा ) | १९३९ |
| आहुति | ( कादंबरी ) | १९४१ |
| वृत्तें व अलंकार | ( काव्यशास्त्र ) | १९४३ |
| विसर्जन | ( खंडकाव्य ) | १९४३ |
| " गरिबांचें राज्य " | ( पटकथा ) | १९४८ |
| साहित्यदर्शन | ( काव्यप्रकार-विभाग ) | १९४८ |
| छान छान गाणीं | ( बालगीतें ) | १९४९ |

### आगामी

| | |
|---|---|
| मराठी सुनीत | ( प्रबन्ध ) |

---

## मुक्तछन्दविषयक टीप :

१. वृत्त, जाति वा छंद यांत रचिलेलें काव्य गेय पद्धतीनें वाचणें किंवा गाऊन दाखविणें शक्य असतें. किंबहुना कांहीं काव्यें भावदर्शी रसोचित पद्धतीनें गायिल्यास मनावर अधिक परिणाम करितात. मुक्तछन्द हा मात्र 'वाचावयाचा' असतो. मुक्तछन्द वाचण्याची पद्धत साधें गद्य वाचण्याच्या पद्धतीहून थोडी निराळी असते. ती ध्यानांत यावयास मुक्तछन्द-रचनेचीं पुढील वैशिष्ट्यें लक्षांत घ्यावयास हवींत.

अ) मुक्तछन्दांत पांच किंवा सहा अक्षरांचा एक एक चरणक ( किंवा गण ) असतो.

आ) एका ओळींत असे एक वा अनेक कितीही चरण येऊं शकतात.

इ) कडवें किंवा विभाग हा किती ओळींचा असावा यास बंधन नाहीं. अर्थानुरोधानें, एका ओळींत, एक वा अनेक चरणक येतात; तसेंच एका विभागांत कितीही ओळी येऊं शकतात.

[ मुक्तछन्दाच्या या प्रकारास कविवर्य अनिल यांनीं "प्रेमजीवन" हे नांव सुचविलें आहे...( 'पेर्ते व्हा' : पृष्ठ ११३ ). ]

२. मुक्तछन्द वाचतांना प्रत्येक ( दीर्घ व ऱ्हस्वही ) अक्षराचा उच्चार, अभंगादि अक्षरछंदाच्या पद्धतीप्रमाणें, दीर्घ आणि सन्थ करावा....... प्रत्येक चरणकाच्या पहिल्या अक्षरावर ( इंग्रजी ॲक्सेंटप्रमाणें ) सूक्ष्मसा आघात वा किंचित् वजन यावें......चरणकाच्या अंती अल्प विराम घेत वाचावें. अक्षरांचा निसरडा, लवचिक उच्चार करीत वाचल्यास मुक्तछन्द तितका परिणामकारक वाटत नाहीं......

३. मुक्तछन्दांतील चरणकांचे व आघाताचें उदाहरण :—

"चालला चालला । लमाणांचा तांडा
एका गांवाहून । दुजा गांवाला
सम्पली येथली । उसाचीं गुऱ्हाळें। सम्पला येथला। अन्नाचा शेर
आतां दुजें गांव । आतां दुजा मळा।"

'।' ही खूण आघाताची. '–' ही खूण संथ उच्चाराची.